" महाराष्ट्र राजपत्रित वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२, सार्वजनिक आरोग्य विभाग ", या संघटनेच्या नावामध्ये बदल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र.आरजीए-१००२/प्र.क्र.१२२/२००२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ डिसेंबर, २००२.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरजीए-१०९४/सीआर-५६/९४/१६-अ, दि.२२/१२/१९९४.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.संघट-१०९६/२८३/२६९९६/सेवा-६, दि.१७/७/१९९६.
३) महाराष्ट्र राजपत्रित वैद्यकीय अधिकारी वर्ग-२ संघटना यांचे दि.३०/४/२००२ चे पत्र.
४) महासंचालक, आरोग्य सेवा,आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ यांचे दि.५/१०/२००२ चे पत्र.

**शासन परिपत्रक** :-

"महाराष्ट्र राजपत्रित वैद्यकीय अधिकारी वर्ग-२ संघटना, सार्वजनिक आरोग्य विभाग" या संघटनेस संदर्भाधीन क्रमांक १ च्या आदेशान्वये सेवाविषयक संघटना म्हणून शासन मान्यता देण्यात आली आहे. वैद्यकीय अधिकारी गट-ब ही पदे सामान्य प्रशासन विभाग, का.१२ च्या दि.२९/७/९३ च्या शासन निर्णयानुसार गट-अ मध्ये अंतर्भूत केल्याचे आदेश सार्वजनिक आरोग्य विभागाने संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केले आहेत. त्यामुळे महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ च्या नियम २९ सोबतच्या परिशिष्टातील शर्त क्र.५ मध्ये विहित केलेल्या तरतुदीनुसार संघटनेने नाव व पत्त्यांमधील केलेले बदल शासनास संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रानुसार कळविले आहेत.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम,१९७९ च्या नियम २९ सोबतच्या परिशिष्टातील शर्त क्र.५ मधील विहित तरतूदीनुसार, "महाराष्ट्र राजपत्रित वैद्यकीय अधिकारी गट-ब संघटना, सार्वजनिक आरोग्य विभाग" या शासन मान्यता प्राप्त संघटनेच्या नाव व पत्त्यामध्ये आता खालील प्रमाणे बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे,

**संघटनेचे नाव** : महाराष्ट्र राज्य राजपत्रित वैद्यकीय अधिकारी गट-अ संघटना, सार्वजनिक आरोग्य विभाग.

कृ.मा.प.

**पत्र व्यवहाराचा पत्ता** : प्रमुख कार्यवाह, द्वारा-अधिक्षक बंगला, १ ला मजला, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई-४०० ००१.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(द.दा.देशपांडे)
शासनाचे अवर सचिव.

प्रत,

१) उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र राज्य राजपत्रित वैद्यकीय अधिकारी गट-अ संघटना, सार्वजनिक आरोग्य विभाग, द्वारा-अधिक्षक बंगला, १ ला मजला, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
३) महासंचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ००१.
४) प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) सर्व मंत्रालयीन विभाग,
६) निवड नस्ती.